





**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक-गौखनि-३४/०६१४/प्र.क्र.२५६/ख**

**महसूल व वन विभाग,**
मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला,
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
**दिनांक :- १८ ऑगस्ट, २०२३**

**विषय:-<u>गौण खनिज- पुणे</u>**
मौजे रांजणगांव सांडस, ता. शिरूर या वाळूगटासाठी लिलावपोटी भरलेली ¼ रक्कम परत मिळणेबाबत.
श्री. प्रकाश हरीभाऊ लोंढे, मौजे उरुळी कांचन, जि. पुणे

**<u>शासन ज्ञापन :-</u>**

सन २०११-१२ या वर्षाकरीता मौजे मौजे रांजणगाव सांडस, ता.शिरुर, जि.पुणे हा वाळूगट श्री.प्रकाश हरिभाऊ लोंढे यांना रू.४५,००,०००/- सर्वोच्च बोलीने दि.१६/११/२०११ रोजी लिलावात मंजूर करण्यात आला होता. त्यानुसार लिलावधारक यांनी लिलावाच्या रक्कमेच्या १/४ इतकी रक्कम रु.१५,००,०००/- ही दि.१७/११/२०११ रोजी शासनजमा केली आहे. दरम्यानच्या काळात लिलावधारक श्री.प्रकाश हरिभाऊ लोंढे यांचेवर गुन्हा दाखल होऊन लिलावधारकास अटक झाली होती. त्यामुळे लिलावधारकास लिलावाच्या बोलीप्रमाणे उर्वरित रक्कम शासनजमा करता आली नाही. उर्वरित रक्कम विहित वेळेत न भरल्याने जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे (खनिकर्म शाखा) यांनी पत्र क्र. खनिकर्म/कावि/९५/२०१२ दि. २३/०१/२०१२ अन्वये संबंधित लिलावधारकाची मौजे रांजणगाव सांडस ता. शिरूर या वाळू लिलावाची १/४ रक्कम जप्त करुन फेरलिलाव करण्याचे आदेश दिले आहेत. त्याविरुद्ध लिलावधारक यांनी तत्कालिन मा. राज्य मंत्री (महसूल) यांचेकडे मौजे रांजणगाव सांडस ता. शिरुर जि. पुणे येथील वाळु लिलावाची १/४ रक्कम परत मिळणेबाबत दि.३०/१०/२०१३ रोजी अपील दाखल केले होते.

०२. लिलावधारक यांनी केलेल्या अपीलावर मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दि.०९/०९/२०१४ रोजी अर्धन्यायीक स्वरूपात आदेश देताना जिल्हाधिकारी यांचे आदेश क्र.खनिकर्म/कावि/९५/२०१२ दि.२३/०१/२०१२ रद्द करून लिलावधारक यांनी मौजे रांजणगांव सांडस या वाळूगटाच्या लिलावापोटी शासन जमा केलेली १/४ रक्कम परत करण्याचे आदेश पारित केले आहेत. सबब, लिलावधारक श्री. प्रकाश हरिभाऊ लोंढे यांनी मौजे रांजणगांव सांडस, ता. शिरूर या वाळूगटाची शासन जमा केलेली १/४ रक्कम रुपये १५,००,०००/- (पंधरा लाख फक्त) अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. लिलावधारक श्री. प्रकाश हरिभाऊ लोंढे यांनी लिलावाची १/४ रक्कम रु.१५,००,०००/- (पंधरा लाख फक्त) इतकी रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा

केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर सदर रक्कम अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८२२१५०१५०२३१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.08.22 15:06:03 +05'30'

**(शिवाजी चौरे)**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, पुणे**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४, साधनसंपत्ती कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख”).